सहायक वनसंरक्षक,गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातून विभागीय वन अधिकारी, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: क्र.एमएफएस-०३.२३/प्र.क्र.५८/ फ-८**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ जून, २०२४

**शासन आदेश :-**

सन २०२२-२३ वर्षाच्या निवडसूचीमधून सहायक वनसंरक्षक,गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गातून विभागीय वन अधिकारी, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गात सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थाना | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सुनिल शालिकराव शिंदे, सहायक वनसंरक्षक, वन विभाग, हिंगोली | विभागीय वन अधिकारी, (प्रसिद्धी व माहिती-वने), पुणे | रिक्त पदी |

२. श्री.सुनिल शालिकराव शिंदे यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

i) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधिन राहून प्राप्त मान्यतेस अनुसरुन तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७/०५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील सुचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे.

ii) सदर पदोन्नती ही सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून जेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

iii) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

iv) महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन), नियमावली २०२१ मधील नियम २ (ड) मधील तरतुदीनुसार, पदोन्नतीने नियुक्ती होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजू होणे आवश्यक राहील.

v) श्री.सुनिल शालिकराव शिंदे यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पुर्व सूचना वा नोटिस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

vi) सदर पदोन्नती मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद तसेच मा.उच्च न्यायालय/ मा.सर्वोच्च न्यायालय इत्यादी ठिकाणी जेष्ठतेबाबत काही दावे / याचिका दाखल केले असल्यास, सदर प्रलंबित याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

३. श्री.शिंदे यांना कार्यमुक्त केल्यानंतर त्यांनी पदोन्नतीच्या पदावर तात्काळ हजर व्हावे. कार्यमुक्तीनंतर विहित मुदतीत ते पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा याची नोंद घ्यावी.

४. श्री.सुनिल शालिकराव शिंदे यांनी विभागीय वन अधिकारी, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२५१२४३५६२३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2024.06.25 14:55:50 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव-पश्चिम), मुंबई
९. महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई.
१०. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
११. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोल/पूणे.
१३. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
१४. संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१५.निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२